





# विशेषांक

संपादक
अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

अतिथी संपादिका
श्रीमती आसावरी गुपचुप (पुणे)

सहसंपादक
सोनाली घाटपांडे ( पुणे )
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
रेणूका रेपाळ ( अमेरिका )
सुरुचि नाईक ( नागपूर )
आनंद माने ( सोलापूर )
नाम गुम जायेगा ( ठाणे )
सचिन काकडे ( मुंबई )
सारंग भणगे (पुणे)

मुळात हे विश्व म्हणजे माया. आणी या मायेमधले मायाजाल म्हणजेच इंटरनेट. या इंटरनेच्या विश्वात विहरणारा एक गुरू ग्रह म्हणजेच **ऑरकुट.** या ग्रहावर हजारो महानगरे, लाखो गावे आणि अनेक खेडीदेखील वसलेली आहेत.

या ग्रहाचा रचनाकार **ऑरकुट बुयुक्कोक्टेन** नावाचा गुगलमधील एक इंजिनीयर. **२२ जानेवारी २००६** रोजी ही भूमी वास्तव्यासाठी खुली झाली. आज कोट्यवधी लोक इथे रहातात आणि अजून कितीही लोक इथे सहज सामाऊन जाऊ शकतील अशी जादुई व्यवस्था इथे आहे.

इथे तुम्हाला तुमच्या मूळ स्वरूपात रहाण्याचे बंधन नाही. तुम्हाला आवडेल ते रुप, नाव घेऊन तुम्ही इथे वावरू शकता. कुब्जा सुद्धा इथे माधुरी दिक्षीत बनते आणि माधुरी दिक्षीत एखादं मांजर!! इथे तुम्ही मित्र शोधु शकता, मित्र जोडु शकता आणि त्यांच्या सोबतीने प्रचंड धमाल करु शकता. स्वतःचा छायाचित्रांचा व चलत-चित्रांचा संग्रह करुन मित्रांशी शेअर करु शकता.

तुम्हाला ज्या विषयात रस असेल त्या विषयाशी संबंधीत समुहाचे सदस्य होऊ शकता, किंवा स्वतःचा समुह स्थापन करू शकता. तिथे विविध विषयांवर माहितीचे आदान-प्रदान करू शकता. अगदी **वडापाव लव्हर्स** पासून ते **सोहं साधना** पर्यंत विविध सांप्रदाय (कम्युनिटीज) इथे गुण्या-गोविंदाने एकत्र नांदतात.

प्रत्येक सदस्याचे स्क्रॅप-बुक असते. त्यात त्याला संदेश येतात तसेच तो ही इतरांच्या स्क्रॅप -बुकात लिहू शकतो. काही मंडळी स्वतःच्या स्क्रॅप-बुकापेक्षा इतरांच्या बुकातच जास्त डोकवत असतात (ती मजा काही औरच!). पण एखाद्याला आपलं बुक असं इतरांनी वाचलेलं चालत नसेल तर सेटींग बदलून तशी व्यवस्था करू शकतो. समुहात मात्र तुम्हाला असा खाजगीपणा राखता येत नाही. तिथे जे काही लिहाल ते अख्खं जग पाहू शकतं. पण इथेसुद्धा त्या समुहाच्या संस्थापकाला समुहाबाहेरच्या कुणी तिथे डोकाऊ नये असं वाटत असल्यास तो तशी बंदी घालू शकतो.

एकंदर ही व्हर्च्युअल दुनिया मजेदार तसेचा उपयुक्तही आहे. शोधणा-याला इथे अनेक विषयाचे ज्ञान मिळु शकते, किंवा नुसताच टाईमपास हवा असेल तर तशीही सोय आहे. हौसे, गवसे आणि नवसे सारख्याच प्रमाणात इथे आढळतात.

इथे ब-याच गमती घडत असतात. अख्खी कम्युनिटी काही क्षणात बळकावली जाते किंवा तुमचे स्वतःचे प्रोफाईलसुद्धा हॅक होऊ शकते. तेही कुठलेही युद्ध न करता. त्याचप्रमाणे बळकावलेली कम्युनिटी परत सुद्धा मिळवली जाते.

आमची **मराठी कविता** कम्युनिटी काही दिवसांपूर्वी अशीच बळकावली गेली होती. तिथल्या सदस्यांच्या ब-याच कविता डिलीट केल्या गेल्या. मग आम्ही **काव्यांजली** या नव्या कम्युनिटीत स्थलांतर केले आणि काही मित्रांच्या मदतीने नंतर **मराठी कविता** सुद्धा परत मिळवली. आज या दोन्ही कम्युनिटीजवर आमचे एक मोठे कुटुंबच तयार झाले आहे.

सादर आहे, संपूर्ण ऑरकुटची नाही; पण **ऑरकुटवरच्या आमच्या कवितेच्या दुनियेची छोटीशी झलक.**

नवीन काव्यांजलीवरील उत्साह व वीरश्री



Nilesh

****धागा** - Reloaded**

11/7/07

नमस्कार मित्रहो..........

आपली कम्युनिटि हॅंक करुन कोणी आपणाला हरवू शकणार नाहि. याउलट, त्यामुळेच सर्व कवी-कवयित्री एकत्र आले.

परंतु सर्वात मोठा लॉस झाला तो म्हणजे कवी सनिल यांनी केलेल्या धाग्याचा. जवळ जवळ सहा हजारहून अधिक पोस्ट होते त्यात.सर्व नव कवींसाठि प्रेरणा देणारा असा तो थ्रेड होता.

मला असे वाटते आपण मिळून तो धागा पुन: सुरु करुयात. याकर्ता सर्व मेंबर्चीं साथ आवश्यक आहे. मला ठाऊक आहे तुम्हि नक्किच कराल.

तर चला दीपावलीच्या शुभ मुहुर्तावर पुन: एकदा धागा विणण्यास सुरुवात करुया.

मी एक चारोळि पोस्ट करुन सुरुवात करत आहे. पटापट धाग्याला विणण्यास सुरुवात करावी हि विनंती.

खूप काहि सोसावं लागतं

नशीबाचे खेळ खेळताना

पाठून वार केला जातो

तीच कधितरी जिंकत असतानां

--निलेश लोटणकर



Nilesh

nice aanandaaaa



गोट्याभाऊ.......

keeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeeep going guyz
tya murkha maansala aapan haarvun dakhvu yaa



Nilesh

**@diwali gift**
**this dhaaga is a special diwali gift to SANIL**



आनंदा

11/7/07

वास्तव घेऊन येतो
धागा तुमच्यासाठी
लांबवर जायचे आहे
मारा पक्क्या गाठी..

विश्वास आहे माझा
धाग्यावरती माझ्या
पानीपतात गेला
तो घोड्यावरती होता



**काव्यांजली - Marathi kavita**
(5,035 members)

- forum
- polls
- events
- members
- view profile

पुनश्च हरि ओम



Suman.

नव वर्षा निमित्त पुन्हा अकदा...

मला वाटते रे नवा जन्म घेउ
नवा डाव मान्डु नवि साद देउ.
अता वेदनान्चि तुते श्रुन्खला ति
नव्या आसवाना नवे सौख्य दाउ.

मला वाटते रे नवा साज छेडु
नव्या स्पन्दनान्चे नवे गीत गाउ
जुन्या सावल्यान्चि सरे रात मागे
नव्या या पहाते नवे स्वप्न पाहु.

मला वाटते रे नवा श्वास घेउ
नव्या प्रेरनेचा नवा ध्यास घेउ.
कटु आठवान्चि झडु देत पाने
नव्या पालविचे नवे रोप लाउ.

मला वाटते रे नवे विश्व पाहु
नव्या कल्पनेला नवे गाव देउ
मला वातते रे नवा जन्म घेउ
नवा श्वास गुन्फु नवे स्वप्न पाहु.



जोगन

**suman**

bela shende ne gaayalelee shanta shekalenchee kavita aathavali. :)



harshada vinaya

खूपच छान सूमन..



मनु .......

apratim



pallavi

chaan!!



IDवह्म

Excellent



......वैभव......

अविनाशकाकांचा च्याब्लूक



Avinash

**कंडोम**

भांडवल शाही ख~या अर्थाने रुजवलीत तुम्हि मालक
आता या देशावर तुमचेच राज्य चालु झाले आहे मालक

भाकरीसाठी लढायचा अधिकार काढुन घेतलात मालक
नोटा चारुन संप फोडण्यात तरबेज झालात तुम्ही मालक

मजुराचे रक्त खुप स्वस्त दरात मिळते या देशात मालक
५-५०रु थोबाडावर फेकुन ८तास शोषायला चटावलात तुम्हि मालक

देशातल्या राज्यकर्त्यांचे खरे रंग उमगलेत आम्हा मालक
निळे, तिरंगी, भगवे, सा~यांचा एकच रंग उमगले आम्हा मालक

भांडवल शाहित जाति व्यवस्था चांगलिच राबवलित मालक
कंत्राटि कामगार नांवाची नविन जात निर्माण केलित मालक

कंत्राटि कामगार, पण कच्चि बच्चि आहेत आम्हाला मालक
वापरा,काम झाले फेकुन द्या"अस करायला कंडोम नाहि
कामगार आहोत आम्हि मालक

---

अविनाश बेधुंद.स्वच्छंदी..मुक्त जीवन



श्रीकांत पाटील

**कंडोम**

अविनाश वास्तावातिल चित्र उभे केलेत तुम्ही आणि सत्य माहित आहे सगाल्याना पण ते उच्चारुन तुम्ही मोठे सत्कार्यच केलेत



Yogya..Ayogya?

कवितेचे टायटल आणि भेदक कविता.. अगदी नॉक-आऊट पंच मारलात काका तुम्ही!



अमरीश अ. भिलारे.

एकदम झकास.......काका
क्या बात है......खूप वास्तववादी कविता आहे.......
शीर्षक वाचून मी ज़रा.....धास्तावलोच.....की परत एक कविता.....???

शाळा -
एक अविस्मरणीय
धागा



Talli टल्ली

**आई गेली तो दिवस**

चौथीची नुकतीच सुरुवात
बाहेर भन्नाट पाऊस
मधल्या सुट्टीत चिंब भिजून वर्गात आलो

कोल्हे बाई होत्या
नाही नाही ते बोलल्या
सगळ्या वर्गासमोर
आणि सगळा वर्ग
फ़िदी फ़िदी खिदळत होता
तेवढ्यात दरवाजात हेड बाई
आणि त्यांच्याआड मनुमामा
मी टरकलो
हेडबाई कोल्हेबाईंना हळूहळू काही बोलल्या
मनुमामाने चलायची खूण केली
फ़िदीफ़िदी मावळलं
आणि मी घरी निघालो
-----
का कोण जाणे
पुढे काही गृहपाठ केला नाही तरी
कोल्हेबाई मला काहीच बोलल्या नाहीत
कधीच काहीच बोलल्या नाहीत.

----- टल्ली



Yogya..Ayogya?

"धडा" कवितेत
..आणि बिनाबांगड्यांचा हात...ची केलेली पुनुरुक्ती..

"आई गेली तो दिवस" मध्य काही न सांगता केवळ शीर्षकाला तु कवितेत अगदी ताकदीने गुंफले आहेस..
मान गये दोस्त..तुझ्या कविता वेगळ्याच आहेत...असेच दर्जेदार लिहित राहा.



IDब्रह्म

केवळ ~हृदय-स्पर्शी....
Great !



**काव्यांजली - Marathi kavita**
(5,035 members)

forum
polls
events
members

view profile

## कुटुंबातील वाढदिवस



नाम गुम जायेगा

**अमृता**

आयुष्याचा खोलात जाऊन विचार करणारी ,
तो विचार कलात्मक सादर करणारी
अमृता दगे
चित्रकार, कवयत्री आणि गायिका
हिला वाढदिवसाच्या शुभेच्छा
तुझीच एक कविता
तुला या प्रसंगी...

--नामकाका



नाम गुम जायेगा

**आयुष्याचा खरा अर्थ**

====================

आयुष्य आपलं असतंच तसं
किना-यावरचं आपलं नाव
उधळणा-या लाटेने अलगद पुसून जावं
अगदी तसं

आयुष्य आपलं असतंच तसं
वाळवंटात लिहिलेल आपलं नाव
वाहणा-या वा-याने नकळत पुसून जावं
अगदी तसं

वारा काय अन पाणी काय
फक्त एक निमित्त असतं
आयुष्याचा खरा अर्थ कळण्यासाठी
निसर्गाने सांगितलेलं गुपित असतं

नाव पुसुन जाण्या आधी
नाव लिहिणं मात्र गरजेचं असतं
मृत्युने झडप घालण्याआधी निदान
ते लिहीण्याचं तरी समाधान मिळवायचं असतं!!!!!!!!!!!!

------
..............(((अमृता)))




आनंद राजगोळे ...

"व्हाव्यात तुझ्या सर्व इछ्या पूर्ण
व्हावीत साकार स्वपने तुझी ..!
जीवनात यावे आनंदाचे क्षण
करीत सुवर्णाची उधळण..!
यावी तुझ्या जीवनात सुख-समृध्दी
आनमोल आयुष्य तुला लाभावे ..!
हीच प्राथना करतो ईश्वराच्या चरणी "

वाढदिवसाच्या हार्दिक शुभेछ्या...!!

आनंद राजगोळे



Avinash

Amruta..Happy Birth Day



Anonymous

Janmdivsachya hardik shubhechha amruta!!



सुरेश शिरोडकर

अमृता,
वाढदिवसाच्या शुभेच्छा!!!



PRAJakt..

वाढदिवसाच्या हार्दिक शुभेछ्या...!!



Prabha

वाढदिवसाच्या हार्दिक शुभेछ्छा...!!

नाते शब्दांचे

Ambarish

**मरसडीज..!**

मरसडीज CD 220 सिल्व्हर,
जेव्हा माझ्याबाजूने हवा फेकत.. झंझावत
ऐट दाखवत.. निघून गेली.
तेव्हा खरतर मला क्षणिक खंत झाला,
माझी वडीलोपार्जीत स्कूटर
तिच्या हवेने डुगडुगण्याचा..........

रोज सकाळी, सूरु होण्याआधी,
जेव्हा झुकवाव लागतं स्कूटरला ... तेव्हा
मला होत असतो भयंकर आनंद..!
की, निर्जीव स्कूटर का होईना पण
कुणीतरी आपल्यासमोरही झुकल्याचा....!!!

उलटपक्षी, मरसडीज सुरु करण्याआधी
मालकालाच झुकाव लागत असेल दारात,
आणि मग सुरु होत असेल ती..
मिठाला न जागणारी गाडी...!!!

बायकोचा खांद्यावर हात !
रस्त्यांप्रमाणे, वळणावर आणि ट्राफिकमध्ये,
बदलत जाणारी तिच्या हाताची पकड
त्या मरसडीज मालकाला कधीच अनुभवता येणार नाही !

समोर हॅण्डल धरुन लहान मुलगी,
नवराबयाकोमध्ये बसलेला मुलगा,
आणि "ह्यांच्या" आधाराने सवरलेली
आणि मुलाला साम्भाळणारी "ही"..
असा एकत्रित कुटुंबस्पर्शाचा आनंदच घेता येत नसेल..
तर मरसडीज काय कामाची ?

माझ्या स्कूटरचे सर्विसिंग झालं... की
निदान दहा दिवस तरी तिच्या हॅण्डलचे ग्रीस,
माझे हात काळे करत राहते...
पण मला त्याचा कधीही तिरस्कार वाटला नाही!
कारण हात स्वच्छ ठेऊन, काळ्या मनाने
आणि काळ्या पैशाने, मरसडीज घेण्यापेक्षा
ते बरे असते.......!!!!!

अंबरीशचे स्वप्न

तरीपण.. एक पिढीजात स्वप्न म्हणून
मी, मरसडीजची बरीच चित्र, घरात लवली आहेत..
काल मुलांना मी प्रत्यक्ष मरसडीज दाखवली..
झंझावत.. माझ्याबाजुने हवा फेकत
तेव्हा खरतर मला क्षणिक खंत झाला,
माझे वडीलोपार्जीत स्वप्न... माझ्या मुलांना
डोळे भरुन दाखवता न येण्याचा.....!!!!!!

-अंबरीष
१/१/२००९

प्रसन्ना

Ek number...



Let there be

मरसडीज CD 220 सिल्व्हर,
जेव्हा माझ्याबाजूने हवा फेकत.. झंझावत
ऐट दाखवत.. निघून गेली.
तेव्हा खरतर मला क्षणिक खंत झाला,
माझी वडीलोपार्जीत स्कूटर
तिच्या हवेने डुगडुगण्याचा..........

हा पहिला सिक्सर !!

रोज सकाळी, सूरु होण्याआधी,
जेव्हा झुकवाव लागतं स्कूटरला ... तेव्हा
मला होत असतो भयंकर आनंद..!
की, निर्जीव स्कूटर का होईना पण
कुणीतरी आपल्यासमोरही झुकल्याचा....!!!

हा दुसरा !!

तेव्हा खरतर मला क्षणिक खंत झाला,
माझे वडीलोपार्जीत स्वप्न... माझ्या मुलांना
डोळे भरुन दाखवता न येण्याचा.....!!!!!!



**MARATHI KAVITA**
**मराठी कविता**
(36,776 members)

- forum
- polls
- events
- members
- view profile



आदिमाया -मुझे ही

**कागदाची होडी**

कुठ्नही लिहावं
अशी वही मला दिलीस
आतून दार उघडेल
अशी खोली मला दिलीस
माझ्या काचेच्या तावदानातून
दिसणाया सूर्याला
सूर्य म्हणू दिलस
आणि माझ्या अडगळीच्या खोलीत
कधीही नाही डोकावलस........
हं......
आता माझ्यासारखं
कागदाच्या होडीत बसून
तरंगता येत नाही तुला
तरीही त्या होडीवर छत्री धरुन
पावसातून धावतोस
हे ही कळतेच ना मला!!

- सोनाली



Phoenix Ac Close
zakkaaaaaaaaaaas

२ मनस्वी कवयत्री



Anil .........!
Sonalee zakkas



swa ti - स्वाती
gr8



Let there be
mindblowing !!



harshada vinaya

**"हो" 'नाही'**

"ए, ऐकतोयस ना ?"
असं पुसल्यावर मी
म्हणालास "हो" नेहमीप्रमाणे
खरंच आहे म्हणा ते
ऐकतच होतास तू,
बोलला नव्हतास कधीही,
आणि मलाही बोलायला
सांगितलं नाहीस कधीही !!

Candle light dinner ,किंवा Surprise party,
अगदीच म्हटलं तर
माझं तुला समुद्रावर **ओढत** नेणं,
एखादी कविता कानापाशी कुजबुजणं,
"तुला नाही सुचलं हे?"
असं विचारल्यावर सुदधा
"हो" एवढंच म्हणालास

"माझं प्रेम आहे तुझ्यावर
लग्न करशील माझ्याशी?"
असं विचारलं होतं ना मी
तेव्हा म्हणाला होतास पहिला "हो"
नंतर तुझे खूपसे "हो" ऐकले
पण सगळे तितकेच कोरडे

"आताशा तूझा 'हो' सुदधा
मला 'नाही' सारखा ऐकू येतो रे"
असं म्हणाले
तेव्हाही म्हणालास "हो"च

हर्षदा



अमरीश अ. भिलारे.
sahi.......

**अतिथी संपादिकेविषयी थोडंसं-**

श्रीमती आसावरी गुपचुप यांनी दिल्ली विद्यापीठातून जर्मन विषय घेऊन, अनुवाद तंत्र व अन्वयार्थासह एम.ए. ची पदवी प्राप्त केलेली आहे. जर्मन भाषेव्यतिरीक्त संस्कृत भाषेवरही त्यांचे प्रभुत्व आहे.

आजवर त्यांनी फर्ग्युसन महाविद्यालय, पी. बी. जोग महाविद्यालय येथे प्राध्यापिका म्हणून, तसेच गुरुकुल प्रशालेत शिक्षिका म्हणून काम केलेले आहे. याव्यतिरिक्त त्या जर्मन विषयाच्या खाजगी शिकवण्या घेतात, तसेच एम.ए. च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शनही करतात. IBM, Volkswagen, DaimslersChryslers, T systems, Vishay, Praj अशा कंपन्यांकरता अनुवादाची कामे त्यांनी केलेली आहेत. तसेच त्या System Consultant, Fergusson College, Fluent, Global words सारख्या संस्थाकरिता फ्री-लान्स ट्रांन्सलेटर म्हणून काम करत होत्या. त्यांनी ग्रीम्स च्या काही परिकथा अनुवादित केल्या ज्या सकाळ वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झालेल्या आहेत. सध्या त्या जीवनमुक्तिविवेक या संस्कृत लिखाणाचा, आणि Im Stahl des Augias या जर्मन नाट्याचा प्रयोगाकरिता अनुबाद करत आहेत.

त्यांना भरतनाट्यम या नर्तन-कलेत विशेष गती आहे. गुरुवर्या श्रीमती माणिक अंबिके यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी S.N.D.T. University मधून भरतनाट्यमची सहा वर्षाची पदविका प्राप्त केलेली आहे. त्यांचा अरंगनेत्रम चा कार्यक्रम १९९६ मध्ये झाला. सध्या त्या गुरुवर्या स्वाती दैठणकर यांच्याकडून पुढील शिक्षण घेत आहेत. त्यांच्या राजस सुकुमार या स्टेज शो मधील समूहात त्यांचा सहभाग असतो. फर्ग्युसन महाविद्यालयात आलेल्या जर्मन पाहुण्यांसमोर सादर करण्याकरिता त्यांनी अष्टनायिका हा कार्यक्रम दिग्दर्शित केला होता. त्या स्वतः भरतनाट्यमचे वर्ग ५ वर्ष चालवत होत्या.
त्यांची कवितेची एक खास अशी शैली आहे. त्यांची एक कविता

“डोळे मीट”, ते म्हणाले
आणी मला तर ओढ तुझ्या नजरभेटीची !

“हात जोड” , ते उद्गारले
आणी माझे हात आसुसले, तुला सर्वांगाने कवळायला...
जसं धावत जाऊन समुद्र मिठीत घ्यावासा वाटतो ना, तसंच !

“मस्तक झुकव, लीन हो”
पण का ? खाली बघून संवाद कसा घडायचा?

त्यांनी आर्त वेदनांची गाणी म्हणायला सांगितली
आणी माझ्या मनात तर थुईथुई आनंदाची कारंजी !
.
.
खरंच मी नास्तिक ठरले !

## अतिथी संपादिकेच्या नजरेतून ऑरकुट

छे बाबा! आता ऑरकुट या विषयावर काय लिहायचे!! असा विचार करत पीसी ऑन केला, ऑरकुटवर लॉग-इन झाले. अनेक नवीन कवितांमध्ये आकंठ नाहून अनेक नवीन मित्रांबरोबर गप्पा-टप्पा झाल्यावर लक्षात आले, अरे! आपण ऑरकुटबद्दल लिहायला पीसी चालू केला होता!!!

म्हणजे थोडक्यात सांगायचे, तर ऑरकुट हे एक व्यसन आहे. नशा आहे.

समविचारी मित्र भेटणं, एकत्र काही तरी विधायक करणं, ही आपली भावनिक गरज असते. आपल्या नेहमीच्या वर्तुळात आपण ह्या गोष्टी करतही असतो. पण या गरजेचे पोषण करणारी ऑरकुट ही एक सोय आहे! माझी एक मैत्रीण मध्यंतरी सर्व्हे करत होती, की ऑरकुट वरच्या कम्युनिटीज प्रत्यक्षपणे किती किती माणसे जोडतात. काहीतरी विधायक करण्याच्या दृष्टीने, भावनिक दृष्ट्या किंवा नुसते भेटणे या पातळीवर सुद्धा. ऑरकुटवर अनेक जुने मित्र, कट्टे परत भेटल्याचे अनेक नमुने आहेत. परंतु नवीन मित्र भेटुन खरंच काहीतरी विधायक इथे घडू शकते, यावर माझा इथे मराठी कविता वर येण्या आधी विश्वास नव्हता.

खूप दिवस इथल्या कविता नुसतीच वाचत होते. खूप दिवस म्हणजे खरं तर खूप वर्ष सुद्धा म्हणता येईल... मी कविता करायचे, पण त्या कोणाला वाचून दाखवाव्या, असं कधी वाटलं नाही। माझ्या मते कविता ही एकट्याने वाचण्याची गोष्ट होती. पण अशी कविता लिहून कोणाला तरी वाचायला देण्याची कल्पना मात्र आवडली. म्हणजे आपल्या समविचारी लोकांशी संवाद साधता येतोच, पण कवितेबरोबरच व्यक्तिगत संवाद पण सुरु रहातो, अशा विचाराने मराठी कविता मध्ये कविता पोस्ट करायला सुरुवात केली.

मग हळु-हळु मित्र भेटत गेले, आणि न दिसणारं असं एक संपूर्ण विश्वच तयार झालं. मग रोज रात्री या गुत्त्या कडे पावले वळू लागली. आधी नुसते विचार वाटून घेणारी ही मंडळी काही उपक्रम सुद्धा करतात, काहीतरी घडवतात हे पाहून खरंच अभिमान वाटला.

हे सगळं झालं फक्त या कम्युनिटीविषयी... म्हणजे ऑरकुट चा मला आलेला अनुभव! परंतु प्रत्यक्षात ऑरकुट चे अनेक गैरवापर अगदी सर्रास चालतात. आणि या व्हर्च्युअल जगात जिथे कोणी कोणाला ओळखत नाही, तिथे तर आपले अस्तित्व किती धोक्यात असते! मला वाटते, म्हणूनच आपण इंटरनेट बाबतचे कायदे आणि अधिकार याबाबत सुद्धा सजग असले पाहिजे.

शेवटी असं आहे, की माणूस माणसाला शोधत असतो. इंटरनेट द्वारे, पत्राद्वारे किंवा प्रत्यक्ष! खरी गरज असते, ती संवाद साधण्याची! धोके सगळीकडेच आहेत, असतात! पण त्या बदल्यात आपल्याला सख्खे मित्र भेटत असतील, तर it is worth it!!!! Is it not???

--- आसावरी गुपचुप

शुभं भवतु

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. **netaksharee@gmail.com**